निरीक्षक (गट-ब), राज्य उत्पादन शुल्क संवर्गातील अधिकाऱ्यांना महसूली संवर्ग बदलून देणेबाबत व त्यांच्या पदस्थापनेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
### शासन आदेश क्रमांक- इएसटी-१२१८/प्र.क्र. ९३/ राउशु-१

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- १५ डिसेंबर, २०१८.

वाचा:

१. शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/कार्या.१२, दि.२८.०४.२०१५.

२. शासन आदेश क्रमांक- इएसटी-१२१५/प्र.क्र.१५६/ राउशु-१, दि.२७.०३.२०१७.

शासन आदेश:

निरीक्षक, राज्य उत्पादन शुल्क (गट-ब) या संवर्गातील खालील **स्तंभ (२)** मधील नमूद अधिकाऱ्यांना "महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसूली विभाग वाटप नियम, २०१५ मधील नियम १२" अन्वये निरीक्षक, राउशु या पदावरील पदोन्नतीच्या वेळी वाटप झालेल्या महसूली विभागामध्ये त्यांच्या विनंतीनुसार बदल करण्यात येत असून त्यांची पदस्थापना खालील स्तंभ (४) मध्ये दर्शविलेल्या रिक्त पदावर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | वाटप झालेला महसूली संवर्ग | बदली करुन देण्यात आलेला महसूली संवर्ग | पदस्थापना |
|---|---|---|---|---|
| १ | श्री. ए. एस. पवार | नाशिक | कोकण-२ | डोंबिवली, ठाणे. |
| २ | श्री. अविनाश घरत | नाशिक | कोकण-२ | ए विभाग, मुंबई |
| ३ | श्री. एस. जी. गवस | औरंगाबाद | कोकण-२ | सी विभाग, मुंबई |

२. हे आदेश तात्काळ अंमलात येतील. सदर अधिकाऱ्यांनी त्यांना बदलून दिलेल्या महसूली संवर्गामध्ये दर्शविलेल्या पदस्थापनेचा कार्यभार तात्काळ स्वीकारावा. सदर आदेशाची अंमलबजावणी तात्काळ व कार्यक्षमरित्या होण्याकरिता आयुक्त, राउशु यांचेमार्फत खालीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

अ) सदर आदेश प्राप्त झाल्यानंतर अधिकाऱ्यांना तात्काळ कार्यमुक्त करावे. उपरोक्त अधिकारी त्यांच्या सध्याच्या पदावरून कार्यमुक्त होऊन रूजू होण्यासाठी आल्यानंतर त्यांना विनाविलंब रूजू करून घ्यावे. सदर अधिकाऱ्यांना रूजू करून न घेतल्यामुळे काम न देता सक्तीचा प्रतिक्षाकाळ ठरवून वेतन व भत्ते देण्याचा प्रसंग उद्भवल्यास संबंधीतांवर जबाबदारी निश्चित करून त्यांचेविरूद्ध कारवाई करण्यात येईल.

ब) संबंधित अधिकाऱ्यांना नवीन पदस्थापनेच्या जागी हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते नवीन पदस्थापनेच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास त्वरीत कळवावे.

३. सदर आदेशात बदल करून घेण्यासाठी कोणत्याही अधिकाऱ्याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे ती गैरवर्तणूक समजून संबंधित अधिकाऱ्यांविरुद्ध शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल.

४. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१८१२१५१३२९४४४०२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Punam Hiraman Wagde

Digitally signed by Punam Hiraman Wagde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=26d7295f0f289d96eecb9e12c2850ebd4f894edc0ea69760a3c1561515a6bf87, cn=Punam Hiraman Wagde
Date: 2018.12.15 13:35:04 +05'30'

**( पु.हि.वागदे )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रती:**

१. आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
३. सर्व विभागीय उपायुक्त, राज्य उत्पादन शुल्क (मार्फत आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.)
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
६. सर्व संबंधित अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क (मार्फत आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.)
७. संबंधित अधिकारी (मार्फत आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.)
८. कार्यासन अधिकारी, राउशु-२ व राउशु-३, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. **निवडनस्ती (राउशु-१).**